अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, शिरपुंजे, ता.अकोले, जि.अहमदनगर येथील टप्पा-२ मधील इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय क्रमांक : शाआबां-२०१०/प्र.क्र.१४/का.१३**
**आदिवासी विकास विभाग,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- १ एप्रिल, २०१०.**

**वाचा :** शासन निर्णय क्र.शाआंबा-२००६/प्र.क्र.१४०/का.१७, दि.७ नोव्हेंबर, २००६
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, संगमनेर, जि.अहमदनगर यांचे दि.११/०१/२०१० चे पत्र

**शासन निर्णय :** कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, संगमनेर, जि.अहमदनगर यांनी दिनांक ११ जानेवारी, २०१० च्या पत्रान्वये त्यांचे कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, शिरपुंजे, ता.अकोले, जि.अहमदनगर येथील टप्पा-२ मधील इमारत बांधकामाचे एकूण रु.७७.७९ लक्ष इतक्या रक्कमेचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहे. सदरील कामास २००४-०५ च्या दरसूचीवर आधारित रु.६२.६५ लक्ष इतक्या रक्कमेस शासन निर्णय दि.७/११/२००६ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केलीली आहे. तथापि कामाचा वाव वाढल्याने तसेच दर सूचीतील दर वाढल्यामुळे रु.७७.७९ लक्षचे सुधारीत अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यता देण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडे सादर करण्यात आले होते.

२. सुधारित अंदाजपत्रक उप-अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, राजूर यांनी तयार केलेले असून कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, संगमनेर, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर तसेच प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर, जि.अहमदनगर व मुख्याध्यापक, शासकीय आश्रमशाळा, शिरपुंजे यांनी साक्षांकीत केले आहे.

३. सदर अंदाजपत्रकातील वाढ प्रामुख्याने नवीन आराखड्यानुसार वाढलेले जोते क्षेत्रफळ तसेच पर्यायाने त्यावरील संकल्पचित्रातील बदल व अधिक्य दराची निविदा स्विकृतीमुळे झाल्याच्या

स्पष्टीकरणासह रु.७७,७९,९७८/- एवढ्या रक्कमेस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दिलेली आहे.

४. सदर सुधारीत अंदाजपत्रक सन २००७-०८ च्या दरसूचीवर आधारीत आहे. तथापि ११% विद्युतीकरणाचा खर्च, ५ % सेंटेज चार्जेस, ४ % एस्केलेशन चार्जेस व १२.७०% निविदेचा जादा दर वगळून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर, जि.अहमदनगर यांचे कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, शिरपूंजे, ता.अकोले, जि.अहमदनगर येथील टप्पा-२ मधील इमारत बांधकामाच्या रु.५७,५२,७२०/- (रुपये सत्तावन लाख, बावन्न हजार सातशे वीस फक्त) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५/५/२००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-५ मधील अ.क्र.१ व सार्वजनिक बांधकाम विभाग, नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००४०११७०२२५००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( गी.मो.चांदे )
अवर सचिव

**प्रति,**

महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक .
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, संगमनेर, जि.अहमदनगर.
उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, अकोले, जि.अहमदनगर.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.